**सिंधुदूर्ग जिल्ह्यात रिसोर्स बेस्ड इंटेन्सिव्ह प्लॅनिंग व डेव्हलपमेंट हा पथदर्शी कार्यक्रम राबविण्यासाठी चांदा ते बांदा ह्या योजने अंतर्गत निरा व मध प्रकल्प ही योजना राबविण्यासाठी राज्यस्तरावर राज्यस्तरीय समिती व जिल्हा स्तरावर जिल्हास्तरीय समिती स्थापन करण्यास मंजूरी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक :- केव्हीबी-२०१८/प्र.क्र. ५०/उद्योग-६.**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक :- २२ ऑक्टोबर, २०१८.

<u>वाचा :</u> १) नियोजन विभागाचा, शासन निर्णय क्रमांक:-डीएपी-१०१५/प्र.क्र.५१/का-१४८१, दि. ०७ जुलै, २०१७.
२) उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाचा समक्रमांकाचा शासन निर्णय, दिनांक २१ मार्च, २०१८

<u>प्रस्तावना:-</u>

राज्याच्या सन २०१५-१६ अर्थसंकल्पीय भाषणामध्ये महाराष्ट्राच्या दोन टोकांवरील चंद्रपूर व सिंधुदूर्ग हे खनिज व नैसर्गिक संपत्तीचे वरदान लाभलेले जिल्हे आहेत. या जिल्ह्यातील नैसर्गिक साधनसंपत्तीचा इष्टत्तम वापर होण्याच्या अनुषंगाने रिसोर्स बेस्ड इंटेन्सिव्ह प्लॅनिंग व डेव्हलपमेंट हा पथदर्शी कार्यक्रम राबविण्यासाठी व चांदा ते बांदा ही योजना राबविण्यास नियोजन विभागामार्फत मान्यता देण्यात आलेली आहे. तसेच या योजनेअंतर्गत निरा व मध प्रकल्प योजनांसाठी नियोजन विभागाने जिल्हा यंत्रणेस निधी उपलब्ध करुन दिलेला आहे.

२. उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या दिनांक २१/०३/२०१८ च्या शासन निर्णयान्वये निरा उद्योग व त्याची उप उत्पादने, मध उद्योग प्रकल्पाच्या अंमलबजावणीसाठी महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळास समन्वयन यंत्रणा ( Co-ordinating Agency ) म्हणून मान्यता देण्यात आलेली आहे.

३. सिंधुदूर्ग जिल्ह्यात निरा व मध प्रकल्पासाठी राज्यस्तरीय समिती व जिल्हास्तरीय समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती. त्या अनुषंगाने महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळाकडून दिनांक १६/०५/२०१८ अन्वये प्राप्त झालेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने शासनाने पुढील प्रमाणे निर्णय घेतलेला आहे.

<u>शासन निर्णय</u>:-

सिंधुदूर्ग जिल्ह्याच्या निरा व मध प्रकल्पासाठी खालील प्रमाणे राज्यस्तरावर राज्यस्तरीय समिती व जिल्हास्तरावर जिल्हास्तरीय समिती गठीत करण्यांस मान्यता देण्यात येत असून समितीची कार्यकक्षा पुढील प्रमाणे असेल :-

**अ) राज्यस्तरीय समितीत खालील सदस्यांचा समावेश आहे :-**

१) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ - अध्यक्ष
२) विकास आयुक्त, उद्योग संचालनालय यांचा प्रतिनिधी - सदस्य
३) अर्थ सल्लागार व मुख्य लेखाधिकारी महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ - सदस्य

४) उप मुख्य कार्यकारी अधिकरी (मध), महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ - सदस्य

५) उप मुख्य कार्यकारी अधिकारी (उद्योग) महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ - सदस्य

६)प्रकल्प संचालक (जि.ग्रा.अ. सिंधुदुर्ग) महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ - सदस्य

**ब) जिल्हास्तरीय समितीत खालील सदस्यांचा समावेश आहे :-**

१) प्रकल्प संचालक (जि. ग्रा.अ. सिंधुदूर्ग), महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ - अध्यक्ष

२) जिल्हा नियोजन कार्यालय, सिंधुदूर्ग यांचा प्रतिनिधी, - सदस्य

३) व्यवस्थापक, जिल्हा ऊद्योग केंद्र यांचा प्रतिनिधी - सदस्य

४) प्रशिक्षण पॅनलवरील प्रशिक्षक - सदस्य

५) तालुका वनक्षेत्रपाल - सदस्य

६) उप प्रकल्प संचालक (सचिव सिंधुदूर्ग), महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ - सदस्य

**क) प्रशिक्षण उप समितीत खालील सदस्यांचा समावेश आहे :-**

१) प्रकल्प संचालक -अध्यक्ष

२) प्रशिक्षण पॅनलवरील प्रशिक्षक - सदस्य

३) कौशल्य विकास विभागाचा प्रतिनिधी - सदस्य

४) जिल्हा आय. टी. आय. यांचा प्रतिनिधी - सदस्य

५) उप प्रकल्प संचालक (औद्योगिक पर्यवेक्षक / सचिव),
महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ - सदस्य सचिव

**२. समित्यांची कार्यकक्षा :-**

**१) राज्यस्तरीय समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे आहे :-**

१) कार्यक्षेत्र सिंधुदूर्ग येथील प्रशिक्षण, संशोधन, विकास केंद्र.
२) प्रशिक्षण केंद्रामध्ये करावयाच्या बाह्यस्थ पध्दतीने / कंत्राटी नियुक्त्या.
३) प्रकल्प संचालक / उप प्रकल्प संचालकाची निवड करणे.
४) प्रशिक्षण अभ्यासक्रम ठरविणे.
५) नविन अभ्यासक्रम सुरु करणे.
६) राखीव निधीचे नियोजन / वितरण याबाबत निर्णय घेणे.
७) प्रशिक्षकांचे पॅनल नियुक्त करणे.
८) बांधकाम व इतर अनुषंगिक खर्चाला मान्यता देणे.
९) वास्तूविषयक व बांधकाम विषयक सल्लागार नेमणे.
१०) इमारत बांधकामासाठी कंत्राटदार नेमणे किंवा शासकीय यंत्रणेच्या माध्यमातून बांधकाम करणेसाठी यंत्रणा निश्चित करणे.
११) यंत्रसामग्री खरेदी करणे.
१२) योजनेच्या नियमित नियमांमध्ये / धोरणांमध्ये अपरिहार्यपणे निर्माण होणाऱ्या दोषांची दुरुस्ती करणे.
१३) वरील प्रमाणे नमुद केल्या व्यतिरिक्त ऐनवेळी उपस्थित होणाऱ्या बाबींवर निर्णय घेणे.

**२) जिल्हास्तरीय समितीची कार्यकक्षा खालील प्रमाणे आहे.:-**

१) रु. १,००,०००/- (रु. एक लक्ष मात्र) पर्यंत दैनंदिन खर्चाला मान्यता देणे.
२) प्रशिक्षकांच्या पॅनल नियुक्तीची शिफारस करणे.
३) प्रशिक्षणादरम्यान उत्पादित होणाऱ्या वस्तुंच्या किंमती ठरविणे.
४) प्रशिक्षण तथा प्रशिक्षण अभ्यासक्रमांच्या संदर्भात इतर अनुषंगिक बाबी व धोरणात्मक बदल करण्याबाबत प्रशिक्षण उप समितीच्या सल्ल्याने निर्णय घेणे.

**३) प्रशिक्षण उप समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे आहे:-**

१) पॅनलवरील प्रशिक्षकांमधून प्रशिक्षक नियुक्त करणे.
२) रु. ५०,०००/- पर्यंतच्या दैनंदिन खर्चास मान्यता देणे.
३) प्रशिक्षण कार्यक्रमात बदल करणे.
४) नव्या प्रशिक्षणाचा समावेश करणे.
५) अभ्यासक्रम ठरविणे.
६) प्रशिक्षण कालावधी ठरविणे.
७) लाभार्थ्यांची शैक्षणिक अर्हता प्रशिक्षण कार्यक्रमानुरुप ठरविणे.

**३. प्रशिक्षण कार्यक्रम व अभ्यासक्रमात खाली नमुद करण्यात आलेल्या विषयांवर प्रशिक्षण देण्यात यावे.**

अ) निरा उद्योग
ब) नारळापासून उप उत्पादने
क) मध उद्योग
ड) इतर अनुषांगिक अभ्यासक्रम

**४. या योजनेत लाभार्थीची पात्रता पुढील प्रमाणे असेल:-**

१) सिधुदूर्ग जिल्ह्यातील सुशिक्षीत बेरोजगारांना या योजनेमध्ये प्राधान्य देण्यात यावे.
२) १८ ते ४५ वर्षे वयोगटातील स्त्री पुरुष या योजनेचा लाभ घेण्यास अनुज्ञेय.
३) लाभार्थ्यांच्या शैक्षणिक अर्हतेबाबतचा निर्णय प्रशिक्षण कार्यक्रमांनुरुप प्रशिक्षण उप समिती मार्फत वेळोवेळी घेण्यात यावा.

**५. प्रशिक्षण खर्च :- मान्यता**

| अ.क्र. | खर्च मर्यादा | सक्षम प्राधिकारी |
|---|---|---|
| १ | दैनंदिन खर्च रु. ५,०००/- | प्रकल्प संचालक |
| २ | दैनंदिन खर्च रु. ५,००१ ते ५०,०००/- | प्रशिक्षण उप समिती |
| ३ | दैनंदिन खर्च रु. १,००,०००/- पर्यंत | जिल्हास्तर समिती |
| ४ | दैनंदिन खर्च रु. १,००,००१/- वरील | राज्यस्तर समिती |

**६. प्रशिक्षणासाठी प्रशिक्षक वर्ग व इतर अनुषंगिक बाबीसाठी खालीप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी:-**

१) त्या-त्या विषयातील प्रशिक्षकांची बाह्यस्थ पध्दतीने/कंत्राटी पध्दतीने नियुक्ती करण्यात यावी.

२) वर्षाच्या सुरवातीस प्रशिक्षकांचे पॅनल तयार करण्यात यावे.

३) प्रशिक्षकांची शैक्षणिक अर्हता, मानधन व इतर अनुषंगीक बाबींबाबतचा निर्णय प्रशिक्षण उप समिती व जिल्हा समितीच्या शिफारशी नुसार राज्य समिती मार्फत घेण्यात यावा.

**७. प्रशिक्षणा दरम्यान उत्पादीत होणाऱ्या उत्पादनांबाबत खालीलप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी :-**

१) प्रशिक्षणा दरम्यान उत्पादित होणाऱ्या उत्पादनांची विक्री प्रशिक्षण केंद्राच्या विक्री केंद्रात करण्यात यावी.

२) या वस्तुंची किंमत निश्चित करण्याचे अधिकार जिल्हा समितीस देण्यात येत आहेत.

३) उत्पादित वस्तुंच्या विक्रीतून मिळणारा नफा हा प्रशिक्षण संस्थेचा असेल हा निधी संस्थेच्या राखीव निधीत जमा करण्यात यावा.

४) राखीव निधीचा विनियोग करण्याचा अधिकार राज्य समितीकडे राहतील.

**८. योजना राबविण्यासाठी आवश्यक असणाऱ्या कर्मचारी वर्गाची नियुक्ती खालीलप्रमाणे करण्यात यावी:-**

१) प्रशिक्षक, लिपिक व तत्सम कर्मचारी वर्गाची नियुक्ती बाह्यस्थ पध्दतीने/कंत्राटी पध्दतीने करण्यात यावी.

२) कंत्राटी कर्मचाऱ्यांच्या नियुक्तीची संख्या, अटी, शर्ती तसेच वेतन व भत्त्यांबाबतचा निर्णय राज्यस्तरीय समितीमार्फत घेण्यात यावा.

३) या कर्मचाऱ्यांची नियुक्ती राज्यस्तरीय समिती मार्फत करण्यात यावी.

हे सर्व करतांना राज्य शासनाच्या प्रचलित धोरणांनुसार विहित, प्रक्रियेचा/कार्यपध्दतीचा अवलंब करून कार्यवाही करण्यात यावी.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१८१०२२१५२९१३१५१० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajiv Madhav Ambikar

Digitally signed by Rajiv Madhav Ambikar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industries Energy and Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4afb47d807935092599a3e28024dd3d3c461bada30a950e81e666a02aad578f5, cn=Rajiv Madhav Ambikar
Date: 2018.10.22 15:34:14 +05'30'

**(राजीव आंबीकर)**

कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति:- माहितीसाठी व आवश्यक त्या उचित कार्यवाहीसाठी अग्रेषित**

१) मा. मंत्री (नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

२) मा. राज्यमंत्री (नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

३) विकास आयुक्त (उद्योग) उद्योग संचालनालय, मुंबई

४) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ, मुंबई.

५) अवर सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.

६) जिल्हाधिकारी व सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती, सिंधुदूर्ग.

७) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सिंधुदूर्ग.
८) जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हा नियोजन समिती, सिंधुदूर्ग.
९) अर्थसल्लागार व मुख्य लेखाधिकारी, महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ, मुंबई.
१०) महालेखापाल (लेखा व अनुज्ञयेता/लेखापरिक्षा), महाराष्ट्र -१/२, मुंबई/नागपूर.
११) जिल्हा कोषागार अधिकारी, सिंधुदूर्ग.
१२) निवडनस्ती.